सन २०२३-२४ या वर्षामध्ये मे. रुबेन्स हॉस्पीटेक प्रायव्हेट लिमिटेड, मुंबई यांची बँक ग्यॅरंटीची परत करावयाची रु.१५,८६,२५२/- इतकी रक्कम लेखाशीर्ष २२१० ०२२६ अंतर्गत ५२-यंत्र सामुग्री व साधन सामुग्री अंतर्गत नियमित मंजूर अनुदानातून अदा करण्यास मान्यता देण्याबाबत....

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन शुध्दीपत्रक क्रमांकः संकिर्ण-१०२३/प्र.क्र.१०५/आरोग्य-८

१० वा मजला, गोकुळादास तेजपाल रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : १४ मार्च, २०२४

**वाचा :-**

१) सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-३/M/s. Hospitech vs State of Maharashtra/न्या.प्रकरण/११९७०/२३ दि.१८.१०.२०२३

२) सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/लेखा शाखा/निधी/मान्यता/२१७/२४, दि.०४.०१.२०२४

३) शासन पत्र क्र. संकिर्ण-१०२३/प्र.क्र.१०५/आरोग्य-८, दि.७.२०२४

४) सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांचे पत्र क्र.आसेआ/कक्ष-३/टे-३/ हॉस्पीटेक/बँक गॅरंटी /७०३३/२४, दि.११.०३.२०२४

५) मा.उच्च न्यायालय,मुंबई यांचे रिट याचिका क्र.१२९९/२०१४ संदर्भातील आदेश, दि.०८.०३.२०२३

६) आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय,मुंबई यांची दि.२८.०२.२०२४ ची मान्य टिप्पणी.

**प्रस्तावना:-**

सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी संदर्भीय दि.११.०३.२०२४ च्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मे. रुबेन्स हॉस्पीटेक प्रायव्हेट लि., मुंबई यांची जप्त करण्यात आलेल्या बॅन्क ग्यॅरंटीची रक्कम परत करण्यासंदर्भात, मा. मुंबई उच्च न्यायालयाने रिट याचिका क्र.१२९९/२०१४ मध्ये दि.०८.०३.२०२३ रोजी दिलेल्या निर्देशांच्या पार्श्वभूमीवर, अपर मुख्य सचिव (सा.आ.वि.) यांच्या अध्यक्षतेखाली दि.१९.०१.२०२४ रोजीच्या बैठकीतील निर्णयानुसार मे. रुबेन्स हॉस्पीटेक प्रायव्हेट लि, मुंबई यांना सदर बँक ग्यॅरंटीची रक्कम परत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर), मुंबई यांनी सादर केलेल्या प्रस्तावानुसार, सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मे. रुबेन्स हॉस्पीटेक प्रायव्हेट लिमिटेड, मुंबई यांच्या बँक ग्यॅरंटीची रुपये १५,८६,२५२/- (अक्षरी रुपये पंधरा लाख श्याऐंशी हजार दोनशे बावन्न फक्त) इतकी रक्कम मे.रुबेन्स हॉस्पीटेक प्रायव्हेट लिमिटेड, मुंबई यांना लेखाशीर्ष २२१० ०२२६, ५२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (अनिवार्य) या उद्दिष्टाखालील नियमित मंजूर अनुदानातून अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदरहू प्रकरणी वित्त विभागाच्या दिनांक १२.०४.२०२३ च्या शासन परिपत्रकासोबत जोडलेल्या परिशिष्टातील अनु.क्र.९ मधील मुद्दा क्र.१ ते १० मधील अटींची पूर्तता झाली असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

३. यापुर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरिक्षणामध्ये कोणतेही गंभीर आक्षेप नसल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

४. सदर प्रस्तावावरील वितरीत करण्यात येणारा निधी आरोग्य सेवा आयुक्तालयामार्फत लाभार्थ्यांच्या/ पुरवठादाराच्या खात्यात थेट जमा होणार आहे.

५. सदर कार्यक्रमांच्या संबंधित लेखाशिर्षाखाली एक वर्ष जूने संक्षिप्त देयक प्रलंबित नाही. शासनाच्या धोरणानुसार सदर प्रस्तावावरील निधी प्राधिकरणाच्या स्वतंत्र बॅक खात्यात जमा करुन खर्च करण्यात येत असल्याचे त्याचप्रमाणे वित्त विभागाच्या दिनांक १२ एप्रिल, २०२३ च्या शासन निर्णयातील संबंधित असलेल्या सर्व तरतुदीचे /अटी व शर्तीचे पालन झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहेत.

६. सदर अनुदान "सशर्त" असून यापुर्वी शासनाकडुन वितरीत केलेल्या अनुदानाचा विनियोग ज्या कारणासाठी निधी मंजूर केला होता, त्याच प्रयोजनासाठी करण्यात येणार असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे. तसेच वित्त विभागाचे शासन परिपत्रक, क्र.२०१३/प्र.क्र.८५/२०१३/ अर्थसंकल्प-३, दिनांक २५ एप्रिल, २०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

७. या कामी होणारा खर्च, "मागणी क्र.आर-१, (०६) पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (०६) (०१) मुफसल क्षेत्रातील अध्यापनेतर शासकीय रुग्णालये व दवाखाने, ५२-यंत्रसामुग्री व साधनसामुग्री (अनिवार्य), (२२१० ०२२६)" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूदीतुन भागविण्यात यावा.

८. सदर शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विअप्र २०१३/ प्रक्र ३०/२०१३/विनीयम, भाग २, दि.१७.०४.२०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ मधील भाग-पहिला, उपविभाग एक, अ.क्र. ६ नियम ४०अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३१२१७१४५१९४१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

CHANDRAKANT HARIDAS WADE

Digitally signed by CHANDRAKANT HARIDAS WADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7a8cb09a73bc92b24a171080ebd81893480c90bedd57685ea1ce3af533f64bce, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9474E7143B2BC3FD96E8D7BF07D1CE51DE8461D4C34AE1E3F643C11B54523936, cn=CHANDRAKANT HARIDAS WADE
Date: 2024.03.14 11:16:37 +05'30'

**(चंद्रकांत ह. वडे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत:-**

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र वैद्यकीय वस्तू खरेदी प्राधिकरण, मुंबई.

३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई.

४) सहसंचालक, आरोग्य सेवा, (रुग्णालये-राज्यस्तर ), मुंबई.

५) सह संचालक, आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.

६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरीक्षण/लेखा अनुज्ञेयता), मुंबई /नागपूर.

७) वित्त विभाग (व्यय-१३/अर्थ-९), मंत्रालय, मुंबई.

८) सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प कार्यासन), मंत्रालय, मुंबई.

९) मे. रुबेन्स हॉस्पीटेक प्रायव्हेट लिमिटेड, मुंबई (आयुक्तालयामार्फत)

१०) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.

११) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.

१२) निवडनस्ती (आरोग्य-८)